राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत
मौ.सोनहीवरा, ता.परळी (वै.), जि.बीड
येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या
वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास
प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२०१८/प्र.क्र.२४४/पापु-१८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १६ जानेवारी, २०१९

**वाचा-**

१) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र क्र./ग्रापापुवि/तांशा/०२६९५१/२०१८,दि.०४/०९/२०१८
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-७,दि.९/१०/२०१३
३) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-७,दि.१७/३/२०१०
४) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-७,दि.२२/१/२०१४
५) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-७,दि.९/७/२०१४
६) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१६७/पापु-७,दि.१/८/२०१४
७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-७,दि.१७/१०/२०१४
८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-७,दि.१६/२/२०१५
९) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-७,दि.२०/२/२०१५
१०) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-७,दि.१५/६/२०१५
११) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-२०१७/प्र.क्र.५३/पापु-७,दि.०९/०३/२०१८

**प्रस्तावना-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे सोनहीवरा,ता.परळी (वै),जि.बीड येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधिन क्र.१ येथील पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला आहे. सदर योजनेचा दरडोई खर्च रु. ५७६८/- (३.०० किमी अंतरावरील खर्च वगळुन) येत असल्याने संदर्भाधिन क्र.१ व ६ अन्वये, मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई महोदयांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समीतीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला असता त्याबाबत योजनेच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

मौजे सोनहीवरा,ता.परळी (वै),जि.बीड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.५७६८/- एवढ्या वाढीव दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु. ९०,३९,४००/-(ढोबळ) (अक्षरी रुपये नव्वद लक्ष

एकोणचाळीस हजार चारशे फक्त) एवढ्या किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर योजनेस मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, औरंगाबाद यांच्या अध्यक्षतेखालील प्रादेशिक तांत्रिक छाननी समितीसमोर तत्वतः मान्यता घेण्याबाबत आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

२) सदर योजनेची अंमलबजावणी जिल्हा परिषद,बीड यांनी करावी.योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर किमान १ वर्ष योजनेची देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी कंत्राटदारावर बंधनकारक राहील.

३) योजनेची कामे विहीत पद्धतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत

४) योजनेसाठी आवश्यक भुसंपादन, तांत्रिक मान्यता व इतर सर्व परवानग्या प्राप्त झाल्याशिवाय योजनेस कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत

५) योजनेची कामे मजूर किंमतीत कालबद्ध व नियोजनबद्धरीत्या टप्या-टप्याने पुर्ण करण्यात यावीत.

६) योजनेचा उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत.उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.

७) योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी सविस्तर प्रकल्प अहवालात दर्शविलेला खर्चाचा तपशील दुरुस्त करुन सदर खर्च किमान ठेवावा. तसेच सदर खर्च भागविण्याकरीता व योजना आर्थिकदृष्ट्या स्वयंपुर्ण होण्याकरीता संबंधित ग्रामपंचायतीने घरगुती नळ धारकासाठी किमान पाणीपट्टीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी. या सर्व बाबी ग्रामपंचायतीस देणे अंमलबजावणी यंत्रणेच्या अधिकाऱ्याची जबाबदारी राहील.

८) योजना चालविणे, त्याचे परिक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधीत ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत /अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

९) अस्तित्वातील स्त्रोतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

१०) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

११) शासनाच्या प्रचलित तरतुदीनुसार हागणदारी मुक्तीसंदर्भात कार्यवाही करण्यात यावे.

१२) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या अटींची पुर्तता करण्यात यावी.

१३) योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

१४) योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार तथा गैरव्यवहार बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/ कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

१५) योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणेकडून प्राप्त करुन घेऊन शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) यांची राहील.

१६) योजना प्रचलित शासन धोरणानुसार राबविण्यात येत आहे याची दक्षता घ्यावी.

१७) ग्रामंपंचायतीकडे विजबील थकबाकी असल्यास ती पुर्ण भरल्याशिवाय कार्यादेश देण्यात येऊ नये.

१८) पुर्वीच्या योजनेचे लेखे आर्थिकदृष्ट्या पुर्ण केले आहेत किंवा कसे ही बाब तपासणे संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.लेखे पुर्ण करणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११६१५३१०९३३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Sawairam Rathod

Digitally signed by Suresh Sawairam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e695ebef4b8a6c860bec48f3ef34f42f0c13f8d1aa06f854d5b9bd6874084124, serialNumber=bcaaf1242528ff3cdece2c8eb03929321c1c09c0a7c4d906e3b8a47677ad9769, cn=Suresh Sawairam Rathod
Date: 2019.01.16 15:40:46 +05'30'

**( सु.स.राठोड )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता.
२. मा.राज्यमंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता.
३. मा.विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद
४. मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
५. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,बीड
७. महालेखापाल,लेखा परिक्षा,महाराष्ट्र-२,नागपुर
८. महालेखापाल,लेखा परिक्षा,महाराष्ट्र-१,मुंबई
९. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो),बेलापुर,नवी मुंबई.
१०.मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,औरंगाबाद.
११.अधीक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,बीड
१२.संचालक(वित्त),महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,सिडको भवन,बेलापुर,नवी मुंबई.
१३.उपसंचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,लातुर
१४.वरिष्ठ भुवैज्ञानिक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,
१५.कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,लातुर.

१६.अतिरीक्त मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.

१७.अपर मुख्य सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

१८.प्रधान सचिव,वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई.

१९.मु.अ.तथा वि.का.अ. ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

२०.कार्यासने (पापु-०४,०६,०७,०९,१०,१३,१७ व २०), पा.पु.व स्व.वि., मंत्रालय, मुंबई.

२१. निवडनस्ती कार्यासन पापु-१८.